**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूर नळ पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणी करिता जिल्हा परिषद औरंगाबाद व रायगड यांना अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुपेयो-२०२१/प्र.क्र.३०/पापु-१९**
७ वा माळा, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
दिनांक: २३ डिसेंबर, २०२१

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापाधो-१११५/प्र.क्र.९२/पापु-०७, दिनांक ०७ मे, २०१६
२) शासन निर्णय क्रमांक: मुपयो-२०२०/प्र.क्र.१६/पापु-१९, दिनांक ३१ ऑगस्ट, २०२०
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक : अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१.

**प्रस्तावना:-**

राज्यातील ग्रामीण जनतेस शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यात मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम राबविण्यात येत आहे. मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूर नवीन पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणी करिता (लेखाशिर्ष क्रमांक २२१५ - ९९४२) सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रु.२३०.१३ कोटी इतक्या निधीची अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली असून, वित्त विभागाने अर्थसंकल्पिय तरतुदीच्या ५० टक्के प्रमाणे निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या नळ पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणी करिता औरंगाबाद व रायगड जिल्हा परिषदेस अनुदान मंजूर व मुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या नवीन नळ पाणीपुरवठा योजनांच्या अंमलबजावणीकरिता (लेखाशिर्ष क्र.२२१५ ९९४२ अंतर्गत) खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे औरंगाबाद जिल्हा परिषदेस

रु. २,९७,७५,००० /- (अक्षरी रुपये दोन कोटी सत्याण्णव लाख पंचाहत्तर हजार फक्त) **व** रायगड जिल्हा परिषदेस रु. १,८७,४१,०००/- ( अक्षरी रुपये एक कोटी सत्याऐंशी लाख एकेचाळीस हजार फक्त) **असे एकूण रुपये ४,८५,१६,०००/-( अक्षरी रुपये चार कोटी पंच्याऐंशी लाख सोळा हजार फक्त)** इतका निधी खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS) खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहून मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

**मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (लेखाशिर्ष क्रमांक २२१५ - ९९४२)**

| अ.क. | जिल्हा परिषद नांव | वितरीत करण्यात येत असलेला निधी (रुपये) |
|---|---|---|
| १ | औरंगाबाद | **२,९७,७५,०००** |
| | रायगड | **१,८७,४१,०००** |
| | **एकूण** | **४,८५,१६,०००** |

**अटी व शर्ती**

१) जिल्हा परिषदेने सदर अनुदान मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मंजूरी देण्यात आलेल्या नवीन नळ पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणी करिताच खर्च करावे.

२) सदर निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातच खर्च होणे आवश्यक आहे. तो व्यपगत होणार नाही अथवा कोषागारातून आहरित करुन बँक खात्यात काढून ठेवला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत दिलेल्या मार्गदर्शक सुचनांनुसार नळ पाणी पुरवठा योजनांच्या कामांचे त्रयस्थ तांत्रिक परिक्षण करुन घेण्याची व उपस्थित निरीक्षणांची पुर्तता करण्याची सर्वस्वी जबाबदारी अंमलबजावणी यंत्रणाची राहील.

**४) कोणत्याही योजनेवर प्रशासकीय मंजूरीप्राप्त किंमतीपेक्षा जास्त खर्च करण्यात येऊ नये.**

५) जिल्हा परिषदांकडे वितरीत करण्यात आलेला निधी स्वीय प्रपंजी (PLA) किंवा अशा अन्य खात्यामध्ये ठेवण्यात येऊ नये.

६) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत निधी मागणी करतांना चालू आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेला निधी, झालेला खर्च, शिल्लक निधी इत्यादी बाबतची माहिती सादर केल्याशिवाय भविष्यात निधी मंजूर केला जाणार नाही.

७) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आलेला आहे, त्याबाबतची भौतिक प्रगतीची माहिती दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहीत कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणा-या

कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दर तीन महिन्यानी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिका-याने घ्यावी.

८) जिल्हा परिषदांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत .या शासन निर्णयातील व दिनांक ७ मे, २०१६ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तींची व ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची जिल्हा परिषदेकडून पूर्तता होत आहे, याची खात्री करुन घेता यावी, यासाठी महालेखापाल, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत केलेल्या अधिका-यांना लेखा परिक्षणाकरिता संबंधित अंमलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधीत अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

९) अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहित दिनांकांना संबंधीत अंमलबजावणी यंत्रणांनी कार्यासन पापु-१९ /पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करावे. त्याचप्रमाणे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई/नागपूर व पापू-१९ कार्यासनास सादर करावे.

१०) वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र ५ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच उक्त परिपत्रकान्वये आवश्यक असलेली प्रमाणपत्रे या विभागास सादर करण्यात यावीत.

२. याबाबतचा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (२६) मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम (२२१५-९९४२)-३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (दत्तमत) या लेखाशीर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मधील अ.क्र. १ ते १० मधील आवश्यक त्या बाबींची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक: २८५/व्यय-३, दिनांक.१३ ऑगस्ट, २०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२३१६०२००७८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJKUNWAR SANDIP DAFALE

Digitally signed by RAJKUNWAR SANDIP DAFALE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER SUPPLY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=167e8b26eccbbbcdcde7d04cf4bcee02de76e94a47ad503e5395e4b725998c3c, cn=RAJKUNWAR SANDIP DAFALE
Date: 2021.12.23 16:52:58 +05'30'

**(राजकुंवर डफळे)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३) मा. उप सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधान परिषद
६) मा. विधानमंडळ सदस्य/संसद सदस्य (सर्व)
७) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद, रायगड
११) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१२) महालेखापाल, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
१३) उपसचिव ( अर्थ संकल्प), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१४) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई, बेलापूर
१५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग, जिल्हा परिषद औरंगाबाद, रायगड
१७) नियोजन विभाग (कार्यासन- १४४३)/ वित्त विभाग (कार्यासन व्यय-३)
१८) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासन क्र. पापु-०४ व पापु-२०.
१९) निवडनस्ती (पापु-१९)